**राष्ट्रीय कृषि सिंचन विकास योजना कॅफेटेरिया अंतर्गत प्रति थेंब अधिक पीक या योजनेच्या सन २०२४-२५ करिता मंजूर रु.६६७.५० कोटी रकमेच्या वार्षिक कृति आराखड्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्र.राकृवि-०५२४/प्र.क्र.१२४/१४-अे**

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : १६ मे, २०२४

**संदर्भ :** १.कृषि व शेतकरी कल्याण विभाग,कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. D.O.No. 13-22/2023-PC,दि.१४ डिसेंबर,२०२३.

2. दि. ०३ मे, २०२४ रोजी मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली पार पडलेल्या राज्य स्तरीय मंजूरी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त
3. कृषि व शेतकरी कल्याण विभाग,कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No. 7-1/2024-RKVY,दि.१४ मे,२०२४

**प्रस्तावना :**

सन २०१५-१६ पासून प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाची अंमलबजावणी राज्यात करण्यात येत आहे.

केंद्र शासनाच्या दि.०६ एप्रिल,२०२२ रोजीच्या पत्रान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजना-रफ्तार ची राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया या नावाने पुनर्ररचना केली असून त्यामध्ये वार्षिक कृती आराखडा आधारित व सविस्तर प्रकल्प अहवाल आधारित या दोन शाखांचा समावेश आहे. प्रधानमंत्री कृषि सिंचन योजनेतील प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) हा घटक राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरियाच्या वार्षिक कृती आराखडा आधारित शाखेत अंतर्भूत केली असून केंद्र व राज्य हिश्श्याच्या निधीचे प्रमाण ६०:४० असे आहे.

केंद्र शासनाने दि. १४ मे, २०२४ रोजीच्या पत्रान्वये कृषि विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध केंद्र पुरस्कृत योजनांचा मंजूर नियतव्यय कळविलेला आहे. सदर पत्रान्वये प्रति थेंब अधिक पीक या योजनेकरिता रु. २१०.४८ कोटी (केंद्र हिस्सा) मंजूर करण्यात आलेला आहे. तथापि सदर योजनेंतर्गत शेतकऱ्यांचे रु. ६२७.४० कोटीचे दायित्व प्रलंबित असल्याने दि. ०३ मे २०२४ रोजी झालेल्या राज्य स्तरीय मंजूरी समितीच्या बैठकीमध्ये मा. मुख्य सचिव यांनी प्रति थेंब अधिक पीक योजनेच्या रु. ६६७.५० कोटी रकमेच्या वार्षिक कृति आराखड्यास मंजूरी दिली आहे.

त्यानुसार राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) घटकाच्या सन २०२४-२५ करिताच्या रु.६६७.५० कोटीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

१. सन २०२४-२५ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया अंतर्गत प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) योजनेची राज्यात अंमलबजावणी करण्यासाठी रु. ६६७.५० कोटी निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.
२. या योजनेंतर्गत वितरीत निधीचे वितरण करण्याकरिता आयुक्त (कृषि) यांना नियंत्रण अधिकारी व सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.
३. या योजनेंतर्गत वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना राष्ट्रीय कृषि विकास योजना-कॅफेटेरिया अंतर्गत प्रति थेंब अधिक पीक योजनेच्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.
४. सदर योजनेच्या अंमलबजावणीची कार्यवाही महा-डीबीटी प्रणालीद्वारे करण्यात यावी व लाभार्थ्यांना अनुदानाचे वाटप आधार संलग्न बँक खात्यावर करण्याकरिता सार्वजनिक वित्त व्यवस्थापन प्रणालीचा वापर करावा.
५. या योजनेंतर्गत वितरीत निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठवावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०५१६१४२८५६४२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHENDRA SOPAN GHADGE

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=9847eac29efa7aa62661b16d1619a1bfaf6d99b23ec6836d8d498d0797965898, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=761BD1B7183B95814545ACE2DBF80778C68C7EE4EF46BAA6EA9B8BD1F47C2642, cn=MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2024.05.16 14:42:35 +05'30'

**( महेंद्र सो. घाडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
२. अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,

६. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व),
७. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई,
८. महालेखापाल महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर,
९. महालेखापाल महाराष्ट्र (लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर,
१०. वित्त विभाग (व्यय- १/अर्थसंकल्प १३), मंत्रालय मुंबई,
११. नियोजन विभाग (का-१४३१), मंत्रालय, मुंबई,
१२. निवडनस्ती.